महाराष्ट्रातील रस्त्यावरील अपघात स्थळे सुधारणे व अपघात निवारणासाठी स्थापन केलेल्या समितीची फेररचना.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्रमांक- अनिस-२०१५/प्र.क्र.-१५/रा.म.-२**

मंत्रालय ,मुंबई -४०० ०३२.

दिनांक —०४ एप्रिल,२०१५

**पहा -** १) शासन निर्णय क्र .रस्ते सुरक्षा-१०९७/प्र.क्र.१९५/रा.म.२ ,दि.१/१०/१९९७

२) शासन शुध्दीपत्रक क्र .रस्ते सुरक्षा-१०९७/प्र.क्र.१९५/रा.म.२,दि.५/१२/१९९७

३) शासन निर्णय क्र .रस्ते सुरक्षा-१०९७/प्र.क्र.१९५/रा.म.२ ,दि.१८/३/१९९८

४) शासन निर्णय क्र .रस्ते सुरक्षा-१०९७/प्र.क्र.१९५/रा.म.२ ,दि.३१/१२/१९९८

५) शासन निर्णय क्र .रस्ते सुरक्षा-२००६/प्र.क्र.४३/रा.म.२ ,दि.३१/३/२००६

६) शासन निर्णय क्र .अनिस२०१४ /प्र.क्र.६०/रा.म.२ ,दि.०४/०२/२०१५

**प्रास्ताविक—**

महाराष्ट्रातील रस्त्यावरील अपघात स्थळे सुधारणे व अपघात निवारणासाठी श्री .श .रा . तांबे ,निवृत्त सचिव (सा.बां.विभाग) यांच्या अध्यक्षतेखाली अपघात निवारण समिती शासनाच्या समक्रमांकाच्या दिनांक ०१/१०/ १९९७च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आली होती .दिनांक ३१/१२/ १९९८च्या शासन निर्णयान्वये या अपघात निवारण समितीच्या कामकाजाचे महत्व व कामाची व्याप्ती लक्षात घेऊन या समितीस समितीचे कार्य सर्वथैव पूर्ण होईपर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती . या समितीने राज्यातील सुमारे २९००० कि.मी .लांबीच्या राष्ट्रीय महामार्ग व राज्यमार्गावरील अपघात प्रवण स्थळांची पाहणी करुन आतापर्यंत सुमारे आठ अहवालांद्वारे शासनास सुधारणा सुचविल्या आहेत. त्यानंतर दिनांक १०जुलै २००७ रोजी समितीची फेर स्थापना करण्यात येऊन मुख्य अभियंता व सह सचिव सा.बां .विभाग यांच्या अध्यक्षतेखाली समितीची फेर रचना करण्यात आली .अपघात निवारण समितीला संस्थात्मक स्वरुप देण्याच्यादृष्टीने या समितीची फेररचना करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** -

अपघात निवारण समितीच्या रचनेत शासनाने आता बदल करण्याचा निर्णय घेतला असून अपघात निवारण समितीची फेररचना खालील प्रमाणे करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | मुख्य अभियंता व सह सचिव ,सा.बां.विभाग ,मंत्रालय ,मुंबई | अध्यक्ष |
| २ | सर्व प्रादेशिक मुख्य अभियंते,(विद्युतसह ) सा.बां.वि .मुख्य अभियंता (वि.प्र.) मुख्य अभियंता (रा.म.)सार्वजनिक बांधकाम विभाग | सदस्य |
| ३ | पोलीस महानिदेशक (वाहतुक) ,महाराष्ट्र राज्य. | सदस्य |
| ४. | उप सचिव (वाहतुक) ,गृह विभाग ,मंत्रालय ,मुंबई | सदस्य |
| ५. | महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाचे प्रतिनिधी | सदस्य (अशासकीय) |

| | | |
|---|---|---|
| ६. | महाराष्ट्र राज्य ट्रक टेंपो ,बस वाहतूक महासंघाचे प्रतिनिधी | सदस्य (अशासकीय) |
| ७. | वेस्टर्न इंडिया ऑटोमोबाइल्सचे प्रतिनिधी | सदस्य (अशासकीय) |
| ८. | श्री .चांदमल एम .परमार ,कुमारी राजश्री परमार मेमोरिअल फौंडेशन पुणे यांचे प्रतिनिधी | सदस्य (अशासकीय) |
| ९. | श्री .सुधीर बदामी ,वाहतुक तज्ज्ञ | सदस्य (अशासकीय) |
| १०. | श्रीमती राधिका परेरा ,कायदे तज्ज्ञ | सदस्य (अशासकीय) |
| ११. | डॉ .नंदू नांदोस्कर ,आंतरराष्ट्रीय किर्तीचे अस्थिरोग तज्ज्ञ | सदस्य (अशासकीय) |
| १२. | श्री .हर्षद स्वार ,वास्तुशास्त्रज्ञ | सदस्य (अशासकीय) |
| १३ | अधिक्षक अभियंता व उप सचिव (रा.म.) ,सा.बां .वि .मंत्रालय , मुंबई. | सदस्य सचिव |

२. अपघात निवारण समितीची कार्यपध्दती खालीलप्रमाणे राहिल.

अ) समितीने महाराष्ट्र राज्यातील अपघात स्थळांची प्रत्यक्ष पाहणी करणे.

ब) अपघातांची कारणमिमांसा करणे.

क) अपघात टाळण्याविषयी रस्ते सुरक्षा/ उपाययोजना सुचविणे.

ड) अपघात न होण्याबाबत खबरदारीची उपाययोजना सुचविणे.

इ) स्वसंसेवी संस्थेशी, धर्मादाय संस्थेशी, बिनसरकारी संस्थेशी व सर्वसाधारण जनतेशी संपर्क साधून त्यांचा सहयोग मिळविणे.

ई) उपरोक्त माहिती शासकीय मुद्रणालयातून पुस्तकरुपात छापून घेणे.

प) सदर समितीने आपला अहवाल दर तीन महिन्यांनी शासनास सादर करावा.

३. समितीच्या अशासकीय सदस्यांना वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक—प्रवास-१०१०/प्र.क्र.२/सेवा-५, दि.०३/०३/२०१० प्रमाणे प्रवास व दैनिक भत्ता दिला जाईल. तो सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मुख्य अभियंत्यांना मिळणाऱ्या भत्यापेक्षा कमी नसावा.

४. समितीच्या अहवालप्रकरणी पुस्तिका प्रकाशनावर होणारा खर्च २०५९- सार्वजनिक बांधकामे, ८०-सर्वसाधारण, ००१-संचालन व प्रशासन, (कार्यान्वन) ०८ प्रकाशने या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येईल आणि वर्षाच्या एकूण मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. समितीच्या शासकीय सदस्यांना प्रवास व दैनिक भत्यावरील खर्च लेखाशिर्ष-२०५९-सार्वजनिक बांधकामे, ८०- सर्वसाधारण, ००१-संचालन व प्रशासन, ०५ कार्यालयीन खर्चाच्या त्यांच्या कार्यालयाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. श्री. चांदमल एम.परमार, कुमारी राजश्री परमार मेमोरिअल फौंडेशन पुणे, श्री. सुधीर बदामी , श्रीमती राधीका परेरा ,डॉ .नंदु नांदोस्कर ,श्री .हर्षद स्वार या अशासकीय सदस्यांचा समितीच्या

कामकाजात झालेला प्रवास व दैनिक भत्यावरील खर्च हा अनुक्रमे मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे, नागपूर व मुंबई या कार्यालयातून " मुख्य अभियंता " यांना देय असलेल्या किमान दराने देण्यात यावा व सदर खर्च लेखाशिर्ष-२०५९- सार्वजनिक बांधकामे, ८०-सर्वसाधारण, ००१-संचालन व प्रशासन, ०५ कार्यालयीन खर्चासाठी संबंधित मुख्य अभियंता कार्यालयाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. याबाबत मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग पुणे, नागपूर व मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकार देण्यात येत आहेत.

७. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे, नागपूर व मुंबई यांनी अपघात निवारण समितीमधील अशासकीय सदस्यांवर झालेल्या खर्चाची माहिती प्रत्येक तीन महिन्यानंतर कार्यासन अधिकारी ,राष्ट्रीय महामार्ग-२ ,सार्वजनिक बांधकाम विभाग ,मंत्रालय ,मुंबई यांना देण्यात यावी.

८. सदर शासन निर्णय आंतर वित्तीय सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे .

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४१८१७५०१९४८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

N V Bhande

Digitally signed by N V Bhande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary N H, postalCode=400032, st=Maharashtra, cn=N V Bhande
Date: 2015.04.18 18:02:43 +05'30'

(एन .व्ही .भंडे)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा .मुख्यमंत्र्यांचे सचिव ,मंत्रालय ,मुंबई.
२. खाजगी सचिव ,मा.उपमुख्यमंत्री ,मंत्रालय ,मुंबई.
३. खाजगी सचिव ,मा.मंत्री (सा.बां.), मंत्रालय ,मुंबई.
४. खाजगी सचिव ,मा.मंत्री( सा.बां/.सा.उ.), मंत्रालय ,मुंबई.
५. खाजगी सचिव ,मा.राज्यमंत्री(सा.बां)मंत्रालय ,मुंबई.

६. वित्त विभाग ,मंत्रालय ,मुंबई-४०० ०३२.

७. सामान्य प्रशासन विभाग ,मंत्रालय ,मुंबई-४०० ०३२.

८. महालेखापाल-१(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य ,मुंबई.

९. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य ,मुंबई.

१०.महालेखापाल-२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य ,नागपूर.

११.महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य ,नागपूर.

१२.मुख्य अभियंता व सह सचिव तथा अध्यक्ष ,अपघात निवारण समिती ,सार्वजनिक बांधकाम विभाग ,मंत्रालय ,मुंबई-४०३२ ००.

१३.अधीक्षक अभियंता व उप सचिव(रा.म.) तथा सदस्य सचिव ,अपघात निवारण समिती,सार्वजनिक बांधकाम विभाग ,मंत्रालय ,मुंबई-४०० ०३२.

१४.सर्व मुख्य अभियंता/मुख्य अभियंता विशेष प्रकल्प ,मुंबई/विदयुत ,मुंबई/राष्ट्रीय महामार्ग,

१५.कोकण भवन, नवी मुंबई, सा.बां.प्रा.विभाग.

१६.पोलीस महानिर्देशक (वाहतूक), डी.डी.इमारत, जुने जकात घर, शहीद भगतसिंग मार्ग,मुंबई-२३.

१७.उप सचिव (वाहतूक), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

१८. अधीक्षक अभियंता, भूपृष्ठ वाहतुक मंत्रालय, देऊळवाडीजवळ, चेंबूर, मुंबई-७१.

१९.महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मध्यवर्ती कार्यालय, वाहतूक भवन, मुंबई सेंट्रल, मुंबई-४०० ००८.

२०.वेस्टर्न इंडिया ऑटोमोबाईल असोसिएशन, इंडियन मर्चंटस चेंबर बिल्डींग, पहिला मजला, चर्चगेट, मुंबई-४०० ०२०.

२१.महाराष्ट्र राज्य ट्रक, टेंपो, बस वाहतूक महासंघ, पी.डीमेलो मार्ग, वाडीबंदर, मुंबई-४०० ००९.

२२.श्री.चांदमल एम.परमार, व्यवस्थापकीय विश्वस्त, कुमारी राजश्री परमार मेमोरियल फौंडेशन, २८९, टिंबर मार्केट मार्ग, महात्मा फुले पेठ, पुणे-४११०४२.

२३.श्री.सुधीर बदामी, वाहतूक तज्ज्ञ, प्रयास ,बी-२३०३ ,ओबेरॉय स्पेलेंडर ,जोगेश्वरी विक्रोळी लिंक रस्ता ,अंधेरी (पूर्व) ,मुंबई-४०० ०६०.

२४.श्रीमती राधिका परेरा, अधिवक्ता, १-अ, ५ वा मजला, लेंटीन चेंबर्स, दलाल स्ट्रीट, फोर्ट, मुंबई — ४०० ००१ .

२५.डॉ.नंदू नांदोस्कर, आंतरराष्ट्रीय किर्तीचे अस्थिरोग तज्ज्ञ, २/१४७, वार्ड स्ट्रीट, नॉर्थ ॲडिलेड, ॲडिलेड, साउथ ऑस्ट्रेलिया ५००६, ऑस्ट्रेलिया.

२६.श्री.हर्षद स्वार, वास्तुशास्त्रज्ञ ,७ ,रहिमतुल्ला हाऊस ,ऑफीस नं.४ ,दुसरा मजला ,होमजी स्ट्रीट ,फोर्ट.

२७.स्वीय सहायक, सचिव (बांधकामे) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,

२८. स्वीय सहायक, सचिव (रस्ते) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,

२९.स्वीय सहायक, मुख्य अभियंता व सह सचिव सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,

३०.सर्व मा.आमदार महोदय यांना अग्रेषित,

३१.ग्रंथालय, महाराष्ट्र विधान मंडळ, मुंबई व नागपूर.

३२.सर्व उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

यांना माहितीस्तव अग्रेषित.